राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान
राज्य ग्रंथालय नियोजन समितीची पुनर्रचना करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक -मराग्रं-२०१८/प्र.क्र.१२७/२०१८/साशि-५,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०३ नोव्हेंबर, २०१८

वाचा : १) शासन निर्णय, शिक्षण व युवक सेवा विभाग क्रमांक-एलआयबी-२५७५/७९५६/(७०५)/तेरा, दिनांक २९.७.१९७७
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र.मराग्रं-२५२४/प्र.क्र.३६/२०१५/साशि-५, दिनांक ३०.०३.२०१५
३) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र.मराग्रं-२५२४/प्र.क्र.३६/२०१५/(२)/ साशि-५, दि.३०.०३.२०१५
४) ग्रंथालय संचालनालयाचे पत्र, जा.क्र.३१/SLPL बैठक/२०१८-१९/५२९२, दि.२२.०६.२०१८

**प्रस्तावना :**

राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कलकत्ता, या संस्थेची स्थापना भारत सरकारच्या आर्थिक सहाय्याने १९७२ साली झाली. देशातील सार्वजनिक ग्रंथालय सेवेचा सार्वत्रिक विकास करणे, हे प्रतिष्ठानचे उद्दिष्ट आहे. राज्यांमध्ये व संघराज्यांमध्ये ग्रंथालय सेवा प्रभावीपणे राबवून ती वृद्धिंगत करण्यासाठी प्रतिष्ठान, राज्यांना ५०:५० या प्रमाणात अनुरुप अनुदान देते. प्रतिष्ठानच्या या योजना राबविण्यासाठी राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या "सर्वांसाठी पुस्तके" (Books for all) या पुस्तकामधील मार्गदर्शक तत्त्वांनुसार संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राज्य ग्रंथालय नियोजन समितीची स्थापना करण्यात आली. तसेच संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये सदर समितीची पुनर्रचना करण्यात आली होती. त्यानुसार सदर समितीची मुदत दिनांक २९.०३.२०१८ रोजी संपुष्टात आलेली आहे. यास्तव राज्य ग्रंथालय नियोजन समितीची पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान अंतर्गत राज्य ग्रंथालय नियोजन समितीची खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे-

| | | |
|---|---|---|
| १. | सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २. | महासंचालक/संचालक, राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता अथवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ३. | राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान यांच्या अध्यक्षांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४. | राज्य ग्रंथालय संघाचे अध्यक्ष किंवा कार्यवाह | सदस्य |
| ५. | उपसचिव (ग्रंथालये), उच्च व तंत्र शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ६. | शासन नियुक्त सदस्य, श्री. विनय मावळणकर. | सदस्य |
| ७. | ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.(पदसिध्द) | निमंत्रक तथा सदस्य सचिव |

२. सदर समितीची मुदत शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून तीन वर्षापुरती मर्यादित राहील. ग्रंथालय संचालकांनी प्रतिष्ठानकडून राबविण्यात येणा-या अर्थसहाय्याच्या समान निधी व इतर मदत योजनांसाठी मंजूर निधीचा प्रारुप आराखडा सादर करणे व त्यास अंतिम मान्यता घेण्यासाठीचा प्रस्ताव, नियमानुसार तपासून समितीस मान्यतेसाठी सादर करणे बंधनकारक राहील.

३. समितीच्या अशासकीय सदस्यांचा प्रवासभत्ता व दैनिक भत्ता शासन निर्णय, वित्त विभाग, दि.०३ मार्च, २०१० मधील तरतूदींनुसार व वेळोवेळी होणा-या सुधारणेनुसार मंजूर करण्याबाबतची कार्यवाही, संचालक, ग्रंथालय संचालनालय यांचेकडून करण्यात येईल आणि याकरीता होणारा खर्च,"मागणी क्र.डब्ल्यू-४, २२०५ कला व संस्कृती, १०५ सार्वजनिक ग्रंथालये, (०१) ग्रंथालय संचालनालय, (०१)(०१) ग्रंथालय संचालनालय, (अनिवार्य) (२२०५०२५१) ११ देशांतर्गत प्रवास खर्च ",या लेखाशिर्षांतर्गत भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८११०३१४५०१३१९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dattatraya Rambhau Kahar

Digitally signed by Dattatraya Rambhau Kahar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc29789a0057acb8ed170e1748553c17db300239c347be5264afbff5eb51fcac, cn=Dattatraya Rambhau Kahar
Date: 2018.11.03 14:56:09 +05'30'

( द.रा. कहार )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
२. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे विशेष कार्य अधिकारी /खाजगी सचिव,
३. मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे खाजगी सचिव,
४. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचलनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
७. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
८. समितीचे सर्व सदस्य (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
९. संचालक, राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता, (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
१०. ग्रंथपाल, राज्य मध्यवर्ती ग्रंथालय (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
११. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१२. निवडनस्ती (साशि-५)